**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वन विभागामार्फत सहाय्यित नैसर्गीक पुनर्निर्मीतीची (Aided Natural Regeneration) कामे घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक मग्रारो २०११/प्र.क्र.१३०/रोहयो १०अ
मंत्रालय मुंबई-४०००३२.
दिनांक:२८ डिसेंबर, २०११

**वाचा**:-१) शासन परिपत्रक, नियोजन विभाग क्रमांक मग्रारो २०११/प्र.क्र. ८४/रोहयो-१, दि. १/११/२०११
२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक मग्रारो २०११/प्र.क्र.८५/रोहयो-१, दि. ३/११/२०११

**प्रस्तावना**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियमानुसार घ्यावयाच्या कामांमध्ये वनीकरणाची कामे महत्वपूर्ण आहेत. वनीकरणाची कामे मजुरी प्रवण कामे आहेत. या कामांमुळे जंगलाच्या परिसरातील मुख्यत: अनुसूचीत जाती/जमातीच्या लोकांना मोठया प्रमाणात रोजगार उपलब्ध होतो. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचा उद्देश अकुशल मजूरांना मजूरी उपलब्ध करुन देणे हा आहे. वन विभागातर्फे सहाय्यित नैसर्गीक पुनर्निर्मीती प्रकल्प राबविण्यात येत असून या प्रकल्पांतर्गत नैसर्गीक पुनर्निर्मीतीवर भर देण्यात आला आहे. नैसर्गीक रोपांचे संगोपन व संरक्षण करण्याची योजना आहे. नैसर्गीकरीत्या बियांपासून उगवलेल्या रोपांची निंदणी केल्यास व त्यास मातीचा भर घालून आवश्यक खताचा पूरवठा करून त्यांचे गुरे व आगीपासून संरक्षण केल्यास चांगली वने निर्माण करता येतील. सदर प्रकल्प महत्वपूर्ण व मजुरी प्रवण असल्यामुळे महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत वन विभागाच्या जमीनीवर वन विभागामार्फत सहाय्यित नैसर्गीक पुनर्निर्मीती कार्यक्रम घेण्याचा निर्णय शासनाने घेतला असून त्यासाठी तांत्रिक व आर्थिक मापदंडास पूढील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे. सविस्तर दर पत्रक सोबतच्या **परिशिष्ट अ** मध्ये देण्यात आले आहे.

| सहाय्यित नैसर्गीक पुनर्निर्मीती अंदाजपत्रक (मजुरीचा दर रू. १२७/- प्रमाणे) | | | | |
|---|---|---|---|---|
| बाब | तांत्रिक मापदंड | | | आर्थिक मापदंड |
| | रोपे संख्या प्रति हेक्टर | अंतर (मिटर) | खड्डे आकार (मिटर) | |
| ज्या ठिकाणी नैसर्गीक पुनर्निर्मीती कमीत कमी ४२५ रोपे प्रति हेक्टर आहे, अशा रोपांची निंदणी करणे व प्रति हेक्टर २०० रोपे लागवड करण्याकरिता अंदाजपत्रक | ६२५ | निरंक | ०.४५X०.४५X०.४५ (२०० खड्डे) | रूपये ५०,३०३/- म्हणजेच रूपये ८०.४८ प्रति रोप |

## सहाय्यित नैसर्गीक पुनर्निर्मीती कार्यक्रमाची कार्यपद्धती व प्रमुख वैशिष्टे

१. वन विभागा मार्फत वन जमिनीवर प्रकल्प राबविण्यात यावा. उपवन संरक्षक यांनी काम सुरू झाल्यानंतर दर महिन्याला प्रकल्पाचे निरिक्षण कारावे.

२. दिनांक ३ ऑगष्ट २०११ च्या शासन निर्णया प्रमाणे महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या यंत्रणानमार्फत करावयाच्या कामांसाठी रूपये २५ लाख पर्यंत तांत्रिक मान्यता संबंधित विभागाच्या तांत्रिक अधिकाऱ्याने व प्रशासकिय मान्यता तहसिलदाराने देण्याबाबत आदेश आहेत. तथापी सदर कार्यक्रम राबविणे तांत्रिक दृष्ट्या उच्च दर्जाचे व क्लिष्ट काम असल्याने या प्रकल्पावर वरिष्ठ श्रेणिच्या अधिकाऱ्याचे निरीक्षण आवश्यक आहे. हि बाब लक्षात घेऊन रूपये १० लाख पर्यंतच्या कामांसाठी तांत्रिक मान्यता सहाय्यक वन संरक्षक यांनी व प्रशासकिय मान्यता तहसिलदार यांनी द्यावी. रूपये १० लाख पेक्षा अधिक रकमेच्या कामांना तांत्रिक मान्यता उप वन संरक्षक यांनी व प्रशासकिय मान्यता जिल्हाधिकारी यांनी द्यावी.

३. दिनांक २७ मे, २०११ च्या शासन निर्णयाद्वारे यंत्रणाद्वारे कामे करण्यासंदर्भात दिलेल्या मार्गदर्शक सुचना व कार्यपध्दतीचे पालन करावे.

४. काम घेण्यासाठी ग्राम पंचायत/ग्रामसभेचा ठराव व मान्यता आवश्यक आहे. एकापेक्षा जास्त ग्रामपंचायत हद्दितील काम असल्यास पंचायत समितीची मान्यता आवश्यक आहे.

५. केलेल्या कामावर खर्च झालेल्या रक्कमेनुसार प्रशासकीय खर्चाची रक्कम तहसिलदार यांनी वेळेवर वन विभागास प्रदान करावी. जस जसा खर्च होत जाईल त्या प्रमाणात नियमीतपणे प्रशासकीय खर्चाचे प्रदान करावे.

६. सहाय्यित नैसर्गीक पुनर्निर्मीतीची कामे कमीत कमी १० हेक्टर व जास्तीत जास्त ५० हेक्टर पर्यंत मर्यादित असावी. तथापी ५० हेक्टर पेक्षा जास्त क्षेत्र असल्यास दोन प्रकल्प समजून काम करावे.

७. या प्रकल्पाचा प्रती हेक्टरी खर्च रू. ५०,३०३/- इतका ठरविण्यात येत आहे. (परिशिष्ट -अ प्रमाणे). त्यामध्ये सर्व कामांचा अंतर्भाव आहे. तथापी प्रत्यक्ष प्रकल्प क्षेत्राच्या रचनेनुसार, अस्तिवात असलेल्या रोपांच्या संख्येनुसार व लागवड करावयाच्या संखेनुसार सर्व प्रकारच्या उपचारांची आवश्यकता नसल्यास त्याप्रमाणात प्रकल्पाचा प्रती हेक्टरी खर्च कमी होईल. एखाद्या प्रकल्पासाठी आवश्यक असलेल्या उपचारानुसार प्रति हेक्टरी खर्चाची गणना करावी.

८. तांत्रीक मान्यता देणाऱ्या अधिकाऱ्याने त्या प्रकल्पासाठी आवश्यक असलेली कामे मंजुर कार्य आयोजनेप्रमाणे (Working Plan) असल्याचे प्रमाणीत करावे.

९. नैसर्गीक पुर्ननिर्मीतीसाठी निवडलेल्या रोपांना पुरेशा प्रमाणात सुर्यप्रकाश मिळणार असल्याचे प्रमाण पत्र तांत्रिक मान्यता देण्याऱ्या अधिकाऱ्याने द्यावे.

१०. वन विभागाने सदर योजनेखाली निवडलेल्या वनक्षेत्रास उपचार देण्याकामी व अनुषंगीक बाबींच्या संबंधात स्वतंत्र कार्यकारी मार्गदर्शक सुचना कार्यान्वयीन यंत्रणे करीता निर्गमित कराव्या. त्यामध्ये खालील बाबींचा समावेश असावा.

अ) या योजनेखाली उपचार देण्यासाठी फुटव्यापासुन आलेल्या रोपांचा विचार न करणे.

ब) या योजनेखाली निवडलेल्या वनक्षेत्रात जंगल घनता ४० टक्के पेक्षा कमी असावी.

क) जंगल सघन नसावे म्हणजेच वाढता साठा ( Growing stock) व असलेली झाडे कमी प्रमाणात असावी.

ड) उपचार देण्यासाठी निवडलेल्या रोपांची पसंती क्रमानुसार प्रजाती स्पष्टपणे नमुद करावी.

**मग्रारोहयो अधिनियमानुसार आवश्यक बाबी.**

१. ग्राम सभेचा ठराव.

२. जॉबकार्ड धारक मजुरांकडूनच काम करून घ्यावे.

३. हजेरीपत्रक ठेवणे आवश्यक आहे.

४. दर आठवडयाला मोजमाप नोंद करणे आवश्यक आहे

५. दर १५ दिवसांची मजुरांच्या बॅक/पोष्ट खात्यावर मजुरी जमा करणे आवश्यक आहे.

६. कंत्राटदारांमार्फत काम करणे अनुज्ञेय नाही.

७. कामात पारदर्शकता असण्यासाठी सामाजीक अंकेक्षण व्हावे.

८. केलेल्या कामाची नोंदणी MIS वर करणे.

**पारदर्शकतेच्या दृष्टीने आवश्यक गोष्टी**

**१. प्रकल्प सुरू करण्यापुर्वी.**

अ) काम सुरू करण्यापुर्वी स्वच्छ फोटो काढण्याची कार्यवाही वन विभागाने करावी. शक्यतो डिजीटल कॅमेराद्वारे तारीख व वेळेसह.

ब) खालील अधिकारी फोटो काढतेवेळी प्रकल्पस्थळी हजर असावेत व फोटोमध्ये त्यांचा सहभाग असावा.

१. स्थानीक वन अधिकारी

२. तहसिलदार किंवा त्यांचे प्रतिनिधी म्हणून नायब तहसिलदार/अव्वल कारकून/मंडळ अधिकारी या पैकी एक अधिकारी.

३. ग्रामपंचायत प्रतिनिधी जसे सरपंच/ग्रामपंचायत सदस्य/ग्राम सेवक किंवा ग्राम रोजगार सेवक यापैकी एक.

क) प्रकल्पाबाबत तपशिलवार टिप्पणी वन अधिकाऱ्यने तयार करावी व अन्य उपस्थित अधिकाऱ्यांनी त्यावर स्वाक्षऱ्या कराव्यात. त्याची एक प्रत वन विभागाकडे व दुसरी प्रत प्रशासकीय मान्यता देणारे तहसिलदार यांचेकडे ठेवावी.

ड) प्रकल्प स्थळाचे अक्षांश /रेखांश नोंदविण्याची कार्यवाही वन विभागाने करावी, जेणेकरून ते प्रकल्प स्थळ निश्चित करणे सुलभ होईल.

**२. प्रकल्पाचे काम चालु असताना.**

प्रकल्प चालू झाल्यानंतर दोन वर्षांनी वरील 'अ' व 'ब' प्रमाणे कार्यवाही वन विभाग, तहसिल कार्यालय व ग्राम पंचायतीच्या अधिकाऱ्यांनी पुन्हा करावी.

**३. प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर**

प्रकल्प पूर्ण झाल्यानंतरही वरिल प्रमाणे सर्व कार्यवाही पुन्हा करावी.

सदर कार्यक्रम राबवितांना उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोर पणे पालन करण्याची जबाबदारी महसुल व वन विभागाची राहील. तसेच केलेल्या कामाचे तात्काळ पर्यवेक्षण करण्याची जबाबदारीही संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक२०१११२२८०५५३३५१२३५००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

वि. गिरीराज

**(व्हि. गिरीराज)**
**प्रधान सचिव**

प्रती,

मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय मुंबई- ४०० ०३२,
प्रधान सचिव ( वने ) महसुल व वन विभाग, मंत्रालय मुंबई- ४०० ०३२,
सचिव, (ग्राम विकास) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२

महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय मुंबई- ४०० ०३२, ( प्रसिध्दी करीता )
प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व सहसंचालक सामाजिक वनीकरण वृत्ते, पुणे, कोकण वृत्त ठाणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
सर्व विभागीय वनसंरक्षक
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण
विभागीय कृषी सहसंचालक, ठाणे, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, लातुर,
सर्व अधिक्षक कृषी अधिकारी,
उपसचिव, ( रोहयो समिती ) महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुबई,
सर्व उप सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी (मग्रारोहयो), नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई ३२,
निवडनस्ती, कार्यासन रोहयो-१०-अ, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

**परिशिष्ठ-अ**

**दर पत्रक**

**सहाय्यित नैसर्गिक पूनर्निर्मिती**

**ज्या ठिकाणी नैसर्गिक पूनर्निर्मिती कमीत कमी ४२५ रोपे प्रती हे. आहे अश्या ठिकाणासाठी प्रति हेक्टर २०० रोपे लागवड नमूना**

प्रति हेक्टर कामाचा तपशील

मजूरीचे दर रू.१२७/- म. दि. प्रमाणे

लागवड रोपे २०० + ४२५ नैसर्गिक रोपांचे संगोपन

## पूर्व पावसाळी कामे

| अ.क्र. | कामाचा तपशील | मनुष्य दिवस | मजूरी | साहित्य पुरवठा | रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | सर्व्हेक्षण व सिमांकन करणे (४ लहान दगडांची रास उभारण्यासह करणे) | १.०० | १२७.०० | ५०.०० | १७७.०० |
| २ | १०० मीटर x १०० मीटर आकाराचे ग्रीड टाकून आखणी करणे व उपचार नकाशा तयार करणे | १.०० | १२७.०० | ५०.०० | १७७.०० |
| ३ | ग्रीड निहाय नैसर्गिक मौल्यवान प्रजातीच्या रोपट्यांची मोजणी करून नोंदी घेणे व रोपांना रंग पट्टा लावून प्रजाती निहाय नोंद घेणे | ३.५० | ४४४.५० | ६०.०० | ५०४.५० |
| ४ | फुटव्यापासून निर्मित रोपांचे एकेरीकरण करणे, कट बॅक करणे, नैसर्गिक रोपांना आलेले अनावश्यक डोळे काढणे, अनावश्यक फांदया रोपांना ईजा न होता काढणे आणि रोपाभोवती १ मी. व्यासाचे माती काम करणे तसेच नैसर्गिक रोपांच्या वाढीमध्ये अडथळा करणाऱ्या अनावश्यक वेली तसेच इतर झाडोरा काढणे | १०.०० | १२७०.०० | ०.०० | १२७०.०० |
| ५ | जल व मृद संधारणाची कामे करणे | ३१.०० | ३९३७.०० | ०.०० | ३९३७.०० |
| ६ | रोपवन क्षेत्रा सभोवती गुरे प्रतिबंधक चर खोदणे (१.९०x०.६०x१.०० मी. खोली) खोदलेली माती निर्देशा प्रमाणे १ मी. अंतरापर्यंत व १ मी. उंची पर्यंत नेवून टाकणे/ पसरविणे व संलग ताल करणे, चरपरिमीती-१०२ र.मी. प्रति हेक्टर माती काम १२७.५० घ.मी. प्रति हेक्टर. **(१० हेक्टर पेक्षा जास्त क्षेत्र असल्यास फक्त वनांच्या सरहद्दीवर आवश्यकतेनुसार)** | ८२.५७ | १०४८६.३९ | ५० | १०५३६.३९ |
| ७ | आखणी करणे २०० खड्डे (प्रती ५० खड्डे ०.१३ म.दि.+सा.पु.२.२४) | ०.५२ | ६६.०४ | ८.९६ | ७५.०० |
| ८ | खड्डे खोदणे २०० खड्डे ४५ x ४५ x ४५ से.मी.१०० खडयासाठी ६.६० म.दि. | १३.२० | १६७६.४० | ०.०० | १६७६.४० |
| ९ | ऑक्टो ते मार्च रोपवाटिका खर्च २०० + ४० = २४० रु.६.२१ प्रती रोप (मजूरी ४.४५+सा.पु.१.७६) | ८.४० | १०६६.८० | ४२२.४० | १४८९.२० |
| १० | रोपवन संरक्षण ६ महिने-१० हेक्टर साठी १ मजूर | १८.२५ | २३१७.७५ | ०.०० | २३१७.७५ |
| ११ | जाळ रेषा घेणे | २.०० | २५४.०० | ०.०० | २५४.०० |
| | **एकुण** | **१७१.४४** | **२१७७२.८८** | **६४१.३६** | **२२४१४.२४** |
| | आकस्मिक खर्च ३.० टक्के | | ०.०० | ६७२.४३ | ६७२.४३ |
| | मजूर कल्याण ४.० टक्के | | ०.०० | ८९६.५७ | ८९६.५७ |
| | **एकूण एकंदर** | **१७१.४४** | **२१७७२.८८** | **२२१०.३६** | **२३९८३.२४** |

**म्हणजेच रू.२३९८३/-**

**प्रथम वर्षीय कामें**

| अ.क्र. | कामाचा तपशील | मनुष्य दिवस | मजूरी | साहित्य पुरवठा | रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | एप्रिल ते जून रोपवाटिका खर्च २०० + ४० = २४० | २.०९ | २६५.४३ | १०५.६० | ३७१.०३ |
| २ | रोपवाटिका खर्च ४० मरअळी भरणे द्वितीय वर्ष | १.५९ | २०१.९३ | ११२.८० | ३१४.७३ |
| ३ | खड्डे भरणे २०० खड्डे | ३.३२ | ४२१.६४ | ०.०० | ४२१.६४ |
| ४ | रोपांची वाहतूक रोपवन क्षेत्रांपर्यंत प्रती रोप रु.१ प्रमाणे | ०.०० | ०.०० | २४०.०० | २४०.०० |
| ५ | रोपे लागवड सह सिरबोझाने वाहतूक | ३.०० | ३८१.०० | ०.०० | ३८१.०० |
| ६ | मराळी भरणे २० % | ०.८० | १०१.६० | ०.०० | १०१.६० |
| ७ | निंदणी करणे ३ वेळा व माती काम १ मी व्यासाचे, २०० + ४२५ रोपे १०० रोपांसाठी ३.५० म. दि | २१.७६ | २७६३.५२ | ०.०० | २७६३.५२ |
| ८ | १ ल्या निंदणीच्या वेळी रोपाना खत देणे प्रति रोप ०.४५ प्रमाणे | ०.०० | ०.०० | २८१.२५ | २८१.२५ |
| ९ | जल व मृद संधारणाची कामे केलेल्या ठिकाणी बियाण्यांची पेरणी करणे | २.०० | २५४.०० | ५०.०० | ३०४.०० |
| १० | रोपवन संरक्षण -१२ महिने-१० हेक्टर साठी १ मजूर | ३६.५० | ४६३५.५० | ०.०० | ४६३५.५० |
| ११ | जाळ रेषा घेणे | २.०० | २५४.०० | ०.०० | २५४.०० |
| | **एकूण** | **७३.०६** | **९२७८.६२** | **७८९.६५** | **१००६८.२७** |
| | आकस्मिक खर्च ३.० टक्के | | ०.०० | ३०२.०५ | ३०२.०५ |
| | मजूर कल्याण ४.० टक्के | | ०.०० | ४०२.७३ | ४०२.७३ |
| | **एकूण एकंदर** | **७३.०६** | **९२७८.६२** | **१४९४.४३** | **१०७७३.०५** |

**म्हणजेच रू१०७७३/-**

**द्वितीय वर्षीय कामें**

| अ.क्र. | कामाचा तपशील | मनुष्य | मजूरी | साहित्य | रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | एप्रिल ते जून रोपवाटिका खर्च ४० रोपे | ०.४८ | ६०.९६ | ०.०० | ६०.९६ |
| २ | मराळी भरणे २० % + रोपांची वाहतूक रोपवन क्षेत्रांपर्यंत | ०.८० | १०१.६० | १६.०० | ११७.६० |
| ३ | निंदणी करणे २ वेळा व माती काम १ मी व्यासाचे, २०० + ४२५ रोपे १०० | १५.६३ | १९८४.३८ | ०.०० | १९८४.३८ |
| ४ | रोपवन संरक्षण -१२ महिने-१० हेक्टर साठी १ मजूर | ३६.५० | ४६३५.५० | ०.०० | ४६३५.५० |
| ५ | जाळ रेषा घेणे | २.०० | २५४.०० | ०.०० | २५४.०० |
| | **एकूण** | **५५.४१** | **७०३६.४४** | **१६.००** | **७०५२.४४** |
| | आकस्मिक खर्च ३.० टक्के | | ०.०० | २११.५७ | २११.५७ |
| | मजूर कल्याण ४.० टक्के | | ०.०० | २८२.१० | २८२.१० |
| | **एकूण एकंदर** | | **७०३६.४४** | **५०९.६७** | **७५४६.११** |

**म्हणजेच रू.७५४६/-**

## तृतीय वर्षीय कामें

| अ. क्र. | कामाचा तपशील | मनुष्य दिवस | मजूरी | साहित्य पुरवठा | रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | फुटव्यापासून निर्मित रोपांचे एकेरीकरण करणे, कट बॅक करणे, नैसर्गिक रोपांना आलेले अनावश्यक डोळे काढणे, अनावश्यक फांदया रोपांना ईजा न होता काढणे आणि रोपाभोवती १ मी. व्यासाचे माती काम करणे तसेच नैसर्गिक रोपांच्या वाढीमध्ये अडथळा करणाऱ्या अनावश्यक वेली तसेच इतर झाडोरा काढणे | १०.०० | १२७०.०० | ०.०० | १२७०.०० |
| २ | निंदणी करणे १ वेळा व माती काम १ मी व्यासाचे, २०० + ४२५ रोपे १०० रोपांसाठी १.५० म. दि | ९.३८ | ११९०.६३ | ०.०० | ११९०.६३ |
| ३ | रोपवन संरक्षण -१२ महिने-१० हेक्टर साठी १ मजूर | ३६.५० | ४६३५.५० | ०.०० | ४६३५.५० |
| ४ | जाळ रेषा घेणे | २.०० | २५४.०० | ०.०० | २५४.०० |
| ५ | नैसर्गिक पूनर्निर्मितीची नोंद घेणे | १.०० | १२७.०० | ०.०० | १२७.०० |
| | **एकूण** | **५८.८८** | **७४७७.१३** | **०.००** | **७४७७.१३** |
| | आकस्मिक खर्च ३.० टक्के | | ०.०० | २२४.३१ | २२४.३१ |
| | मजूर कल्याण ४.० टक्के | | ०.०० | २९९.०९ | २९९.०९ |
| | **एकूण एकंदर** | | **७४७७.१३** | **५२३.४०** | **८०००.५२** |

**म्हणजेच रू.८००१/-**

## गोषवारा

| अ. क्र. | कामाचा तपशील | मनुष्य दिवस | मजूरी | साहित्य पुरवठा | एकूण | इतर खर्च | एकूण एकंदर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पूर्व पावसाळी कामे | १७१.४४ | २१७७२.८८ | ६४१.३६ | २२४१४.२४ | **१५६९.००** | **२३९८३.२४** |
| २ | प्रथम वर्षीय कामें | ७३.०६ | ९२७८.६२ | ७८९.६५ | १००६८.२७ | **७०४.७८** | **१०७७३.०५** |
| ३ | द्वितीय वर्षीय कामें | ५५.४१ | ७०३६.४४ | १६.०० | ७०५२.४४ | **४९३.६७** | **७५४६.११** |
| ४ | तृतीय वर्षीय कामें | ५८.८८ | ७४७७.१३ | ०.०० | ७४७७.१३ | **५२३.४०** | ८०००.५२ |
| | **एकुण एकंदर** | **३५८.७९** | **४५५६५.०७** | **१४४७.०१** | **४७०१२.०८** | **३२९०.८५** | **५०३०२.९२** |

**प्रती रोप खर्च रुपये ८०.४८**